ई-साहित्य प्रकाशन
वर्ष दुसरे, अंक १६
दिनांक १४ मे २०१०

# आभाळ सांगे रंग कहाणी उमलत्या पुसल्या दिवसांची....

: संपादक :
भारती सरमळकर (मुंबई)

: अतिथी संपादक :
आकाश बिरारी (लंडन)

: सह संपादक :
सोनाली घाटपांडे (पुणे), स्वप्ना कोल्हे (नाशिक), सचिन काकडे (मुंबई)

# संपादकीय........

**मा**झं आभाळ... माझ्या सोबत नेहमी राहिलं.....

एक श्वेत पांढरा कापसाचा इवलासा पुंज.... कापूसच तो...सगळे आभाळ म्हणायचे त्याला... पण माझ्यासाठी ना तो माझा मित्र होता... एक सच्चा मित्र.....एक असा मित्र जो नेहमी माझ्या सोबत असायचा.... दिवस असो की रात्र... माझं आभाळ ....नव्हे माझा मित्रच.... कुणी साथ दिली कुणी नाही पण माझं आभाळ मला सोडून कुठेच गेलं नाही.... काळ्याकुट्ट रातीतही माझ्या आभाळानं मला लख्ख चमचमणा-या चांदण्या दिल्या, ज्यांच्या टिमटिमणा-या प्रकाशात मी माझी दुखः विसरले... पहाटेच्या मऊ मऊ कोवळ्या केशरी आभाळानं माझ्या श्वासात एक नवी उमेद जागवली.. आयुष्याशी दोनहात करत जगण्याची मला हिम्मत दिली. संध्याकाळच्या भरुन आलेल्या आभाळानं मला रडायला शिकवलं... माझं आभाळ .... कधी डोळ्यात उतरून त्यातलं गहिर पाणी झालं....तर कधी मनात साचून मन मोठं करायला शिकवलं.....कधी उंचचउंच भरारी घेताना माझ्यासाठी ते स्वतःला फैलावत गेलं......तर कधी माझ्या पंखाना पहिली झेप घेता यावी म्हणून माझ्यासाठी थोडसं वाकलं....माझं आभाळ... माझ्या सोबत नेहमी राहिलं....

इथे प्रत्येकाचं आपलं असं एक हक्काचं आभाळ आहे... नव्हे असतचं...माझं, तुमचं, त्यांच, सर्वांचं... जन्माला येताच आपण आपल्या हिश्श्याचं आभाळ घेऊन येतो...मग आपला आणि त्या आभाळाचा न तुटणारा, न संपणारा, न थांबणारा असा अविरत प्रवास चालू होतो...अगदि आयुष्याच्या शेवटापर्यंत...कुणी ह्या प्रवासात आपापलं आभाळ गाठतं... तर कुणी आयुष्य जगता जगता स्वतःच एक आभाळ होऊन जात...आणि मग सरतेशेवटी आपलं आणि आपल्या आभाळाचं भेटणं हे तर विधीलिखितच असतं....आयुष्याचा निरोप घेतानाही ते आभाळचं आपल्याला कुशीत घेतं...निजवतं...
मला माझ आभाळ सापडलयं... तुम्हाला तुमचं आभाळ गवसलं का?

नेटाक्षरीच्या ह्या “आभाळ” विशेषांकात आभाळाच्या विविध छटा, त्याचे विविध रंग आज आपल्या समोर काव्यरुपात आणत आहोत... मी आशा करते कि आमची ही “आभाळ” ची इवलीशी भेट आमच्या सर्व रसिक वाचकांना नक्कीच आवडेल... विशेषांकाच्या मुखपृष्ठावरील ओळी व प्रत्येक पानावरील “स्वप्न ना पडे आभाळा” ह्या ओळी प्राजक्त देशमुख ह्याच्या एका कवितेतील आहेत... आभाळाशी असे प्रत्येकाचे जोडलेले नाते घेऊन आज नेटाक्षरी आपल्या भेटीस येत आहे... आहात ना तयार मग आभाळाच्या स्वागतासाठी ?

भारती सरमळकर
संपादक
(मुंबई)



# एक हरवलेलं आकाश ......

## अतिथी संपादकाचं ......

**मी**, आकाश मंगेश बिरारी

डेटा वेअरहाऊसिंगमध्ये टेक्निकल आर्किटेक्ट म्हणून काम करतो. सोप्या शब्दात आयटी. गेल्या काही वर्षापासून नोकरी निमित्त लीड्स, इंग्लंड येथे असतो. अर्थात जगाच्या पाठीवर कुठे जरी असलो तरी स्वतःची ओळख नाशिककर अशीच करुन द्याविशी वाटते.

कवितेचा वारसा बाबांकडून आला. कॉलेजला असताना काही कविता लिहिल्या होत्या. पण आधी अभ्यास आणि नंतर नोकरी यात इतका अडकलो की कवितांकडे दुर्लक्ष झाले. काहीतरी हरवल्याची जाणीव / खंत मात्र कायमच होती. नोकरी निमित्त परदेशात आल्यावर आणि "कॉस्मोपालिटीन कल्चर" मध्ये जगत असताना मराठी भाषेचा वापर कमी कमी होत गेला तिथे कविता कुठून करणार? पण तेव्हाच, ऑर्कुट वर सहज फेरफटका मारत असताना "मराठी कविता" हा समूह सापडला आणि आयुष्याला नवी कलाटणी मिळाली. सुरुवातीला समूहावर एक जुनी कविता टाकली, तिला २-३ रिप्लाय मिळाले. नवीन काहीतरी लिहायचा हुरुप मिळाला. परदेशात जाणवणारा भाषिक एकटेपणा दूर झाला. काही चांगल्या चांगल्या कविता लिहिल्या गेल्या, वृत्त बद्ध गझल लिहायला शिकलो. बघता बघता मराठी कविता आणि मी एकमेकांचा अविभाज्य हिस्सा बनलो. इथल्या कविंच्या कविता ह्या नुसत्या ऑर्कुट पुरत्या मर्यादित राहिल्या नाहीत, तर "नेटाक्षरी" ह्या ई-साप्ताहिका द्वारे त्याला अक्षरशः लाखोंच्या संख्येने देशात / परदेशात विखुरलेले रसिक वाचक मिळाले. मराठी भाषेतील कविता ख-या अर्थाने "ग्लोबल" झाली. समूहाचा नियंत्रक, ऑनर असा मराठी कवितेशी नाते घट्ट करणारा स्वप्नवत प्रवास होता. माझ्यातलं "हरवलेलं आकाश" मला इथे सापडलं. तेव्हा "हरवलेलं आकाश" हेच टोपण नाव घेऊन मी कविता लिहितो.

आकाश आणि मी..... आम्ही दोघे एकमेकांना जन्मापासून जोडले गेलो..... आकाशाचे मला कायमच आकर्षण वाटत आले आहे.... काहीतरी अगम्य, अथांग, गूढ, आश्वासक ! आकाश मला कायमच जवळचे वाटले आहे. कदाचित म्हणूनच माझ्या प्रत्येक कवितेत कुठे ना कुठे आकाशाचा संदर्भ आलेलाच असतो. आकाश, केवळ एक शब्द... पण कितीतरी अर्थांनी वापरला जातो. आकाशाला गवसणी घालण्यापासून ते आकाश ठेंगण वाटण्यापर्यंत. खरतर तुमच्या मूडप्रमाणे आकाश बदलतं, कधी स्वच्छ निरभ्र हसरं, कधी काळवंडलेलं उदास, तर कधी तुमच्या बरोबर भरभरुन रडणारं. ह्या ना त्या प्रकारे प्रत्येक जण आकाशाशी नाते जोडत असतो.

आकाश दिसायला दूर दिसलं, तरी खूप जवळ असतं आपल्या !! नाही का?

**आकाश मंगेश बिरारी**

अतिथी संपादक

(लंडन)

# .... आकाश ....

कोणीतरी आकाशाचे रंग सारे शोधत राही
कोणीतरी आकाशाची लांबी उंची मोजत राही

कोणासाठी आकाश कुठल्या संध्याकाळी सुनं सुनं
कोणासाठी आकाश रोज नेहमीचच जुनं जुनं

कोणासाठी आकाश मनी ओठांवरती जुनी गाणी
कोणासाठी आकाश मागे ठेऊन जात डोळ्यात पाणी

कोणासाठी आकाश कधी आनंदून बरसलेलं
कोणीतरी आकाशाच्या तुकड्यासाठी तरसलेलं

कोणीतरी आकाशात भरारण्याची स्वप्न पाही
कोणीतरी आकाशात हरवलेलं शोधतं राही

ज्याच त्याच आकाश असं ज्याने त्याने जपलेलं
प्रत्येकाच्या उरात इथे आकाश एक लपलेलं

स्वप्न ना पडे आभाला....



**हरवलेलं आकाश**
**आकाश बिरारी - (लंडन)**
*अतिथी संपादक*

# ... भिजलेलं आकाश ...

स्वप्न ना पडे आभाळा....

आकाश....

पंखात भरून घेतलेलं आकाश
हृदयात खोलवर साठलेलं आकाश

पिंज-याच्या गजातून खुणावणारं आकाश
आनंदाने गवसणीत सापडणारं आकाश

चंद्र तारकांच्या प्रीतीचं आकाश
कधी कधी स्मृतीचं आकाश

लालीमा ल्यालेलं तेजाळलेलं आकाश
धुसर ढगात काजळलेलं आकाश

स्वप्नाच्या डोळाभर पसरलेलं आकाश
पांघरून अंगावर ओढलेलं आकाश

धरतीने क्षितिजावर धरलेलं आकाश
मनो-यांवर थोडसं उरलेलं आकाश

कधी कधी सुखावणारं निळंशार आकाश
कधी मात्र खांद्यावर भार भार आकाश

प्रत्येकाच स्वतःच जपलेलं आकाश
ज्याच्या त्याच्या रंगांमध्ये भिजलेलं आकाश

**सुरुचि नाईक - (नागपूर)**



# ...नभ एकले...एकले...

नभाचं एकटेपण कुणाला उमजावं?
तेही बापड्याने आपणच सोसावं.

नभालाही असतात काही "कठीण प्रसंग"
स्वतःच हसत निभवायचे, इथेही नाहीच संग !

त्याला रोज भेटल्यावाचून सूर्य-ता-यांचं अडतं,
चंद्राला, पावसाला, तेच तर "मोकळं" अंगण देतं

नभालाही कधी कधी खेळावसं वाटतं,
एकटचं पण बिचारं, सा-यांत असून एकटं !

कधीतरी असह्य मग नभालाही होतं
एखाद्याच्या मनात शिरुन बेभान कोसळतं

जग म्हणतं, "अरे अरे, काय हा प्रसंग,
आज तर बिचा-यावर आभाळचं कोसळलं

माणसाचं बरं, निदान जग तरी हळहळतं,
नभावर कोसळायला जगात "आभाळ" देखील नसतं.

विशालांचे विशाल आनंद, विशालच ती दुःखं,
जगाला सांभाळताना हृदयच विशाल उलगडतं.

कुण्या कवीला अधे मधे जाणवते ती वेदना....
नभ फक्त कौतुक करतं.. "छान आहे कविता"

**प्रभा प्रभुदेसाई - (चेन्नई)**

स्वप्न ना पडे आभाला....



# ... माझं जग ...

आभाळाच्या कॅनव्हासवर.. चिथाडलेले ढग..
खरं सांगु का? इतकचं तर.. आहे माझं जग.

ढग कधी सोनपंखी.. कधी किर्र कावळे..
कधी शुभ्र कापुसगुंडे.. कधी साजण सावळे.

आभाळ माझे मोजायाला.. ढगांचीच पट्टी..
ढगांच्या असण्याशीच.. पक्की झालीय गट्टी.

ढग येतात-जातात.. कॅनव्हास तसाच असतो..
पाखोटीच्या पैलाव्याला.. उगीच वेगळा दिसतो.

भक्क एखाद्या मध्यान्ही.. निवळुन येताच नजर..
अर्काळलेले नितळ आभाळ.. डोळ्यात करते गजर.

अनंत पिढ्या मग माझ्या.. सहज स्वर्गात जातात..
आभाळ होऊन माझ्या ओल्या.. डोळ्यांमध्ये पहातात.

स्वप्न ना पडे आभाळा....



**अहं ब्रह्मास्मि - (पुणे)**

# ... एक आकाश माझही ...

स्वप्न ना पडे आभाळा....

माझ आकाश कायम माझच असत
तसही कोणी मागायला नाही येणार ते
हसू नकोस.....माहीतीय मला
खरच नाही येणार................कोणीसुध्दा
का यावं?? अस काय विशेष
तो एक तुकडा................
म्हटलं तर फाटकातुटका
माझ्या मनात कायमचा विसावलेला
पावसाला आणणारा
विजांना चमकवणारा
शुभ्र धुकं पाखरणारा
आणि हळुच त्या तेजोगोलाचं
दर्शन घडवणारा
म्हण म्हण पुरे त्याचं कौतुक
जेलस झालास ना???
नाहीच कळणार तुला
आमच स्पेशल नातं
ए.........रुसू नको ना......
लहानपणी आजी मग आई-बाबा
सरतेशेवटी तू......................
सर्वांनाच घर दिलयं ना??
...........त्या आभाळात..........



**सोनाली घाटपांडे - (पुणे)**

# ... भीती वाटते
# आभाळ ओळखेल मला ...

स्वप्न ना पडे आभाळा....

आकाश कधी माझं कधी तुझं
दोघांनी वाटुन घेतलेलं आपापल्या परीने
आभाळ कस काहीच बोलत नाही
जेव्हा छेडावं ढगांना एखाद्या पावसाच्या सरीने

आभाळ तुझं माझं
आता नकोस वाटतं
जेव्हा घेऊन तुझ्या आठवणी
ते अंगणात पहाटे भेटत

आता तुझा तो पहाटेचा लालसर सूर्य
अन माझा अमवासेचा लपून बसलेला चंद्र
आपण दोघ कसे वेड्यासारखे शोधायचो
तुटणा-या ता-याकडे सुखाचा संसार मागायचो
आभाळ भरुन आल्यावर आपण दोघ भेटायचो
मनात असो वा नसो... तरी सरींना खेटायचो

आता मी आभाळाकडे बघत नाही....चालत असतो
समोर दिसणा-या रस्त्याकडे बघत...
कधी खाली मान घालून....
भीती वाटते आभाळ ओळखेल मला...

अन कदाचित विचारेल....
तू कुठे आहे म्हणून....



**कवि ग्रीष्म**

## ... फ्युचर ...

स्वप्न ना पडे आभाळा....

तुला कवळायचं खुप मनात होतं
म्हणून वाढवत गेलो
हातांचा आवाका
तर तू अजून प्रसरण होत गेलास

तुला गाठणं तर दूरच
तुला नजरेत साठवणंही दुरापास्त होत गेलं
तुझी ऊंची वाढतेच आहे
वाढतेच आहे

पण गाठेन तुला एक दिवस
मी असेन नसेन
पण माझा एखादा DNA
तुला नक्की समेटेल
गुंडाळेल, चिमटीत धरेल

नाचवेल
बोटांवर नाचवेल

**नाम गुम जायेगा - (ठाणे)**



## स्वप्न ना पडे आभाळा....

आकाशाच्या पायरीवर
एक पाऊल टाकले
आणि कळलेच नाही
कि मी आकाश झाले

आकाशाचे लिंपण
अंगावर लिंपत गेले

आता कोणत्या
विश्वव्यापी पोकळीला
व्यापून उरणार होते
हे सुध्दा निळाइला
कळले नाही

मग
उरुन पुरणार की
पुरुन उरणार?
हे समजायचे भानही
निळाईतून सुटले नाही

शिल्लक राहिलेल्या
दोन चार चांदण्या
आणि एखाद दुसरा चंद्र सूर्य
दान देऊन टाकला
संपले सर्व काही
तर समोर पुन्हा अफाट दरी
आणि त्यात मूर्ती सोवळी

**मुक्ता पाठक शर्मा - (सिंगापूर)**



# ... आसमंत ...

मी अनंत, दिगंत, आसमंत....
मी प्रचंड... माझा कुणा न कळला पार
मी रहस्य...तुम्ही अजाण क्षितिजापार
न जाणला कुणी...माझा आदि न अंत
मी अनंत, दिगंत, आसमंत....

मी नश्वर घटकांचा ईश्वर
मी व्योम नक्षत्र सर्वेश्वर
मी सृष्टि निर्मितीचा एकच साक्षी
मी धरणी, सूर्य, चंद्राचा भगवंत
मी अनंत, दिगंत, आसमंत....

मी छाया, माया-मृगजळ
मी पवित्र, सर्वत्र, निर्मळ
मी सजीव, निर्जीव, सृष्टीचा निर्माता
मी पंचप्राणातील एक प्राण जिवंत
मी अनंत, दिगंत, आसमंत....

मी इंद्र सामावून सर्व नक्षत्रांना
मी अलंकार धारण करतो ता-यांना
पृथ्वी केवळ शोभवते मज कंठ
मी अनंत... !
मी दिगंत... !
मी मी आसमंत.....!!

स्वप्न ना पडे आभाळा....



**अंबरीश देशपांडे - (अमेरीका)**

# ... आभाळबाबा ...

आजी म्हणायची..
'आभाळबाबा बघतोय बरं वरुन...'

चोरुन साखर खाताना..
बायोबाईच्या अंगणात आंबे चोरतांना..
डबक्यातली बेडकं दगडांनी मोजताना...
'आजी आजारी होती' शाळेत कारण सांगताना..
वाटेतल्या खड्ड्यावर झावळ्या टाकताना..
त्यावरुन आपटल्यावर फिदफिदतांना..

नजर हळूच वर जायची ....
ढगातुन कुणी बघतं का? ढगातुन कुणी बडबडतयं का....?

मग हळुहळु कमी झाले...वर बघणे नाही...
आंबे चोरणं ... बेडूक मोजणं ... वगैरे वगैरे ...

शाळेत मारामा-या झाल्या की मी वर पहायचा ...
कापूस डावीकडून सरकत उजवीकडे जायचा ...
वाटायच आता आभाळबाबा रागावणार
त्या गडका-याच्या पावट्याला बदडणार ...

तो बदडून निघून जायचा ...
मी शिवाईच्या डोंगरावरुन आभाळबाबाला दगड मारायचा..
इतक्यात कुठ वीज बरसली ... अन पावट्याची घराची कौल घसरली..
मी हसत किना-यावरुन नाखव्याला ओरडून सांगायचा..
"हुडी आभाळाला टेकल तेव्हा आभाळबाबाला पत्ता दाव घरचा" .....

एकदा आजी निघून गेली...

होती तिथच पण आपले म्हणायचे निघून गेली....
मी म्हणायचा "बोलावा माघारी"
आई रडायची "गेली रे तुझ्या आभाळबाबाच्या घरी.."
मी शिवाईवरुन बॉंब ठोकायचा...
नाखव्यासोबत चक्कर मारायचा...
"तो" काही बोलना..
बोलायला "तो" काही भेटंना..
मग मी सुरु केलं..परत..
बेडकं मोजायला..
झावळ्या तोडायला..
नारळावर चढून पाणी संपवायला..
बायोबाईला नको नको करायला....

सगळे म्हणायचे ...
आजीनच ठेवलं होतं शेफारुन..
पण मला माहिती होत...
आजी म्हणायची, 'आभाळबाबा बघतोय बरं वरुन.."

स्वप्न ना पडे आभाळा....



प्राजक्त देशमुख (नाशिक)

रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रकाशनाचा ध्यास ‘नेटाक्षरी’ जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह द्विगुणीत होतोय, नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ५०००० मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्टमित्रांना फॉरवर्ड करण्यास आमची काही हरकत नाही परंतु असे करताना आमच्या आयडीचा अंतर्भाव केल्यास आम्ही आभारी राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

------------------------

ई-साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामूल्य

ई-साप्ताहिके

स्वरनेटाक्षरी ऑडियो अल्बम, हास्य नेटाक्षरी, बालनेटाक्षरी

व प्रसिद्ध झालेली

ई-बुकस

टल्लीची शाळा, मकरंदच्या त्रिवेण्या, ग्रेव्हयार्ड लिटरेचर, चार क्षण, तो आणि ती, प्रियेचे अभंग, देशी दारुचे दुकान-3D

------------------------

हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी तसेच सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी..

**netaksharee@gmail.com**

ई-साहित्य प्रतिष्ठानचे नवीन ई-बुक
“ई-शाळा” वाचलतं का? ह्या ई-मेल वर
**eshaala@gmail.com**
आपली विनामुल्य प्रत आजच राखून ठेवा

